**वनक्षेत्राचे सर्वेक्षण, सिमांकन व जमाबंदी या योजनेत्तर योजनेखाली २० अस्थायी पदांना सन २०१८-१९ या वर्षासाठी मुदतवाढ देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०१८/प्र.क्र.१८७/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २७.०९.२०१८.

**पहा :-**

१) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक -कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.२४/१७-१८/२११७; दिनांक १४.०२.२०१८.
२) वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ५.०३.२०१८.
३) शासन निर्णय समक्रमांक दिनांक १४.०३.२०१८.
४) वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ७.०९.२०१८.

**शासन निर्णय :**

वनक्षेत्राचे सर्वेक्षण, सिमांकन व जमाबंदी या योजनेत्तर योजनेखालील २० अस्थायी पदे दिनांक २८.०२.२०१९ पर्यंत चालू ठेवण्यासाठी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र. १ अन्वये प्रस्ताव सादर केला होता.

**२.** उपरोक्त प्रस्तावानुषंगाने वित्त विभागाच्या संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयाच्या आधिन राहून, सदर २० अस्थायी पदांना या विभागाच्या समक्रमांक दिनांक १४.०३.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक १.०३.२०१८ ते दिनांक ३०.०९.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

**३.** वित्त विभागाच्या दिनांक ७.०९.२०१८ रोजीच्या शासन निर्णयानुसार सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या अधिनस्त सर्व अस्थायी पदांना दिनांक २८.०२.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहे. यास्तव **प्रपत्र-अ** मध्ये दर्शविल्यानुसार २० अस्थायी पदे **दिनांक १.१०.२०१८ ते दिनांक २८.०२.२०१९ पर्यंत** चालू ठेवण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे:-

अ) सदर २० अस्थायी पदे ६ महिन्यांपेक्षा अधिक कालवधीसाठी रिक्त नाहीत.
ब) सदर २० अस्थायी पदे वन विभागातील पदांच्या आढाव्याअंती मान्य केलेल्या आकृतीबंधातील २५०२५ पदांमध्ये समाविष्ट असणे आवश्यक आहे.

**४.** या पदावर होणारा खर्च प्रधान शिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर), ०१ वनीकरण, १०१ वनसंधारण विकास व पुनर्निर्मिती (०१) (०२) वनांचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (२४०६ ०१०२) या लेखाशिर्षा खाली सन २०१८-१९ या वित्तीय वर्षातील मंजूर होणाऱ्या अनूदानातून भागविण्यात यावा.

**५.** हा शासन निर्णय वित्त विभागाचे क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ५.०३.२०१८ व दिनांक ७.०९.२०१८ च्या शासन निर्णयास अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९२७१५२३४५३३१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2018.09.27 15:28:33 +05'30'

( वीरेंद्र तिवारी )
अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. सर्व विभागीय आयुक्त.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम मुंबई.
५. मुख्य वनसंरक्षक, ठाणे/ पुणे/ नागपूर/औरंगाबाद.
६. वनजमाबंदी अधिकारी, भोर /औरंगाबाद/कोंकण, नागपूर.
७. महालेखापाल-१ (लेखा परिक्षा) / (लेख व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. महालेखापाल-२ (लेखा परिक्षा) / (लेख व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. नियोजन विभाग, (योजना-१४), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. वित्त विभाग, व्यय-१०, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११. ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१२. फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१३. निवडनस्ती, फ-३ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

**प्रपत्र-अ**

| अ.क्र. | पदनाम | पद संख्या | पदांचा वृत्तनिहाय तपशील |
|---|---|---|---|
| १ | वनजमाबंदी अधिकारी | ४ | (पुणे-१ /औरंगाबाद-१ / ठाणे-१/ नागपूर-१) |
| २ | वनपाल | १ | (ठाणे-१) |
| ३ | मंडळ अधिकारी | १ | (पुणे-१) |
| ४ | लेखापाल | १ | (पुणे-१) |
| ५ | वनसर्व्हेक्षक | ५ | (पुणे-१/ठाणे-३/औरंगाबाद-१) |
| ६ | वनक्षेत्रसर्व्हेक्षक | १ | (पुणे-१) |
| ७ | चेनमन | २ | (ठाणे-२) |
| ८ | चपराशी | २ | (पुणे-१ / प.मुंबई (वन्यजीव)-१) |
| ९ | जीपचालक | १ | (पुणे-१) |
| १० | वाहनचालक | १ | (नागपूर-१) |
| ११ | पहारेकरी | १ | (नागपूर-१) |
| एकूण | | २० पदे | |